


संपादक

सचिन काकडे (मुंबई )
सोनाली घाटपांडे ( पुणे )
आनंद माने (सोलापूर)
सारंग भणगे ( पुणे )
स्वप्ना कोल्हे ( नाशिक )
सुरुचि नाईक ( नागपूर )
रेणूका रेपाळ (अमेरिका)
नाम गुम जायेगा ( ठाणे )
अहं ब्रह्मास्मि ( पुणे )

## हा अंक इंटरनेटवरील मराठी साहित्य प्रेमींना अर्पण









आजवर तुम्ही 'नेटाक्षरी' ला दिलेला प्रतिसाद वाखाणण्याजोगा आहे. मराठी कवितेच्या प्रसारासाठी सुरु केलेला हा प्रकल्प आज ईंटरनेटवरील हजारो मराठी मेलबॉक्सपर्यंत पोहचला आहे.

ज्या भाषेचा ज्ञानेश्वरांनी 'मराठीचा बोलू कौतुके ' असा गौरव केला, तुकारामांनी ज्या भाषेत ओव्या रचल्या, कुसुमाग्रज, गदिमा, ना.घ. देशपांडे, विंदा, शांता शेळके, मंगेश पाडगावकर, ग्रेस अश्या कित्येक प्रतिभावान कविंना जन्म देणा-या मराठी भाषेला आधुनिक जगात आधुनिक रुपात तिच्याशी रक्ताचं नातं सांगणा-या जगभरातील मराठी लोकांपर्यंत पोहचवायचं कार्य नेटाक्षरी साधत आहे.

मागील महिन्यात घेण्यात आलेल्या हास्य रसावरील नवरसरंग कविता स्पर्धेत कवितांचा पाऊस पडला तब्बल ९६ कविता या स्पर्धेसाठी प्राप्त झाल्या, पुढील आठवड्यात त्या स्पर्धेचा निकाल आणि धमाल हास्यकविता वाचायला मिळतीलच.

या अंकात आम्ही घेऊन आलो आहोत दग्ध मनातून फूटलेला कवितेचा झंकार, कविची घुसमट, कविची उत्सुकता आणि अर्थातच या सर्व भावना व्यक्त करणारी कविची कविता.

वाचकहो ! आम्हाला हवी आहेत तुमची मतं आमच्या अंकाबद्दलची , तुम्हाला आमच्या अंकातील काय आवडतं ? काय आवडत नाही ? नवीन काय वाचायला आवडेल ?, नक्की लिहा, तुमच्या प्रतिक्रिया आमच्यासाठी अनमोल आहेत.
आम्ही आशा करतो नेहमीप्रमाणे हा अंक सुद्धा आपल्या पसंतीस उतरेल.

**-संपादकीय मंडळ**

## अगतिक



पडझड झालेल्या ओसाड भिंतीतून
झिरपत येतोय गार वारा
अंगांग शहारवतोय
अथांग पाऊस कोसळणारा
हातापायाची जुडी करून
कोपऱ्यात बसलेला मी बघतोय
त्या शेंदूर फ़ासलेल्या मूर्तीला
जिला मीच दिलं देवत्त्व
करेल पापाचं निर्दालन
या आशेनं पूर्णत्त्व
बटबटीत डोळयांची ती मूर्ती
बघतीय एकटक माझ्याकडे
नमस्कार करू की नको
या दुविधेत सापडलेला मी
छिनतोय एकेक भिंत माझ्या मनाची
अगतिकपणे

**सुप्रिया चाफ़ेकर**

## माणूस

टोचणाऱ्या पावसाच्या सुयांनी झोडपलंस
कोळपून जाईस्तोवर ग्रीष्माचे दाह दिलेस
बोचणाऱ्या थंडीत पानापानांना ओर्बाडत राहिलास
पण मी अजून उभाय,
येणाऱ्या जाणाऱ्याला सावली देत,
अन साऱ्याच निर्वासितांना
माझ्या खांद्या-फांद्यांचा आसरा देत..
अन म्हणे तूच चालवतोस साऱ्यांचा योगक्षेम !!

अरे तुलाही केव्हाच बसवलाय तुझ्याच भक्तांनी,
माझ्याच बुंध्याच्या सावलीला..



शेंदूर फ़ासून !!!

**सारंग भणगे**

## प्रवासी

अनेक  वाटा, प्रत्येकाच्या निराळ्या
काळानुसार चालणाऱ्या अन वळणाऱ्या

आपण फ़क्त प्रवासी वाटेवरून जाणारे
अन काळाच्या मर्यादा पाळणारे

जेव्हा काळाच्या मनात जेव्हा येते
तुझ्या अन माझ्या वाटेचे मिलन होते

एकमेकांस खुप दिले अन घेतले जाते
परंतू खुपसे द्यायचे घ्यायचे राहून जाते

ऋणानुबंधांच्या नाजुक पाशांनी नाते बांधले जाते
अन काळाच्या गर्तेत तुटूनही जाते

फ़क्त स्मृतींना मागे ठेवून आपली पावले
पुन्हा चालतात आपल्याच वाटा अनंताकडे

या वाटा कधीही संपणार नाही
संपणार ते फ़क्त आपण प्रवासी



**संतोष लचके**



## छोट्याशा बाहुल्या

छोट्याशा बाहुलीच्या
ईवलुश्या बाहुल्या
परी टुक टुक पाहती
दाखवून वाकुल्या

छोट्याशा बाहुलीच्या
नाराज बाहुल्या
माय जाणार तेव्हा
मुसमुसत्या बाहुल्या

छोट्याशा बाहुलीच्या
व्याकुळ बाहुल्या
मायेची वाट पाहता
मान उंचावणाऱ्या बाहुल्या

छोट्याशा बाहुलीच्या
आनंदी बाहुल्या
आजी आजोबांच्या गोष्टीत
रमणाऱ्या बाहुल्या

छोट्याशा बाहुलीच्या
उत्सुक बाहुल्या
झुकझुकगाडीतून पळती झाडे
पहाणाऱ्या बाहुल्या

छोट्याशा बाहुलीच्या
मस्तीखोर बाहुल्या
बाबांच्या पाठीवर
घरभर फ़िरणाऱ्या बाहुल्या

छोट्याशा बाहुलीच्या
समजुतदार बाहुल्या
माय नाही घरी बघून
चिडीचूप बसणाऱ्या बाहुल्या

छोट्याशा बाहुलीच्या
चमकदार बाहुल्या
माय आली पाहून
हुंदडत नाचणाऱ्या बाहुल्या

छोट्याशा बाहुलीच्या
पेंगुळल्या बाहुल्या
माझ्या कुशीत येतात
स्वप्नात रमलेल्या बाहुल्या

**--स्वाती (श्वेता देशमुख)**

**उन्नती**

हे माणसा जेव्हा तू
जंगलात रहायचास
जंगली प्राणी तुझे मित्र होते,
नैसर्गिकच होते !
जेव्हा तू प्रगतीशील झालास
गांव बनवलंस, नंतर शहरे झाली
नापीक , बंजर जमिनीत हरीतक्रांती केलीस,
प्रगतीचे तत्त्वच होते
हरीतक्रांती
आता तुला काय झाले
लोचट नजर आणि
बरबटलेली वासना...
सतत विस्फ़ोटक विचारांनी ग्रासलेला
प्रलयंकारी शस्त्रच शोधून काढतोस तू
तुला नाही वाटत तू स्वतःसाठीच
मत्यु तयार करतोस ...?
विषारी विचारांचे...
अजगर तुझ्या शरीराभोवती
गुंडाळतोस हीच तुझी प्रगती आहे !



**कल्पी जोशी**

**ज्वालामुखी**

डोकं भणभणतंय
हृदयात हालचाल होतेय
मनात दाटलंय बरंच काही
बाहेर येऊ पहातंय

शब्दांची जुळवाजुळव होते
ओठ विलग होतात
शब्दांची बाहेर येण्याची धडपड होते
अन विस्फ़ोटाची चाहुल लागते

नको हा विस्फ़ोट
नको हा विनाश
मना तूच मोठा हो
अन साठवणीला तयार हो ..

**रजनी अरणकल्ले**



**परीसस्पर्श**

परीसाने स्पर्श केला , सोने झाले
कलियुगात त्यामुळे , चोर मागे लागले
पुन्हा लोह व्हावेसे वाटते
सोन्याची निगराणी करावी म्हणते ...

**रजनी अरणकल्ले**

## चांदणे



हसले ऋतु
हसलीस तु
हसणे झाले
चांदणे
तारका झाल्या लुप्त
चंद्राचे दिसणे
मन माझे फुलणे
फुलले फुलले मन माझे भुलले
ह्या चांदण्याच्या मंद प्रकाशाला
अवचित वेडा वारा येवून घाली पिंगा
चंद्र झाकोळल्या नभांच्या पार
शोधी माझे मन त्या चंद्राला
का आले हे सुख माझ्या वाट्याला ?

**श्रीकांत पाटील**

### अजूनही येती कानी पैंजणांचे सूर ...

पावसाळी मेघ दिसे क्षितिजाशी दूर
अजूनही येती कानी पैंजणांचे सूर ।

पश्चिमेचा वारा पांघरोनी तुझा श्वास
आकाशीचा चंद्र देई चांदण्याचा घास
तुझ्या एका कटाक्षाने धडाडतो ऊर
अजूनही येती कानी पैंजणांचे सूर ।



स्पर्श तुझा देवाघरचे गुलाबाचे फूल
तुझ्या स्पर्शानेही जागेपणी चढे भूल
आता दिसे चहूबाजू स्वप्नातला धूर
अजूनही येती कानी पैंजणांचे सूर ।

नशीबाच्या भोगापायी व्यक्त नाही झाले
प्रेम तुझे छातीमध्ये खोल खोल गेले
तुझ्या डोळ्यांतही दाटे भावनांचा पूर
अजूनही येती कानी पैंजणांचे सूर ।

**शंतनू चंद्रकांत चंद्रात्रे**

## नेब्युला नेब्युला

ब्रह्मांडाच्या  पोकळीत ... एक टिंबवलय
दिसत नाही इथून ... हे तेजोवलय

ही पोकळी अनंताची
निर्मयी .. निर्विकार
अंधारमयी .. निराकार

कुठवर जातो नजरेचा ठाव
जिथवर जाते मनाची धाव
चालतो मग हा शोध निरंतर
खत्वाला देऊन अंतर



निर्गुण .. निर्मिक
गर्भार .. केंद्रक
भगव्या नजरेत निळी माया
आडवा येतो मेघ हिरवा..
गगनी दिसतो धुळीचा चांदवा !!
फेर धरतात .. सहा पिशाच्चे
कोलाहल पोकळ .. बुलबुला .. गलगला

हरवत जाते तेजोवलय
दिसतो मागे नेब्युला .. नेब्युला !!

तेजोमेघी नेब्युला .... !!!

**मैत्रेयी भागवत**

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास 'नेटाक्षरी' जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणा-या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय, नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ३५००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्याव्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करून वाचणाऱ्यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फ़ॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतू असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू . मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा. आपल्यासारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहोचवण्याचा आमचा संकल्प सिद्धीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

netaksharee@gmail.com